

१ फेब्रुवारी

**नरदेहाचें उचित। कांहीं करावें आत्महित।**
**यथानुशक्त्या चित्तवित्त। सर्वोत्तमीं लावावें।।** (२-४-१३)

नानाविध सत्कृत्यांचे फळ म्हणजे नरदेहाची प्राप्ती होय. त्यातही आपला देह सन्मार्गी लावणारे धन्य मानावेत. सद्वासना आणि भगवद्भजन हे पूर्वपुण्याईचे फळ होय. भगवंताची भक्ती करण्याची बुद्धी आणि त्यातच सत्संगतीचा लाभ मिळाला की तो परमश्रेष्ठ लाभ समजावा. सद्गुरूंची संगती, पाप-ताप आणि दैन्य, हे सर्व नष्ट करते. दुर्लभ मनुष्य देह लाभल्यावर काहीतरी चांगले फळ पदरात पाडून घ्यावे. ज्यामुळे जन्म सफल होईल असे वागावे. म्हणजे काय करायचे? काही आत्महित साधावे. आपल्या शक्तीनुसार आपले चित्त आणि वित्त म्हणजे द्रव्य परमेश्वराच्या सेवेसाठी लावावे. हेच नरदेहाचे सार्थक होय. असे विचार वाढीला लागण्याचा एक उपाय म्हणजे हरिकथा ऐकावी. कीर्तन प्रवचने ऐकावी. त्यामुळे परमेश्वराचे प्रेम वृद्धिंगत होते. उत्तम परलोक प्राप्तीसाठी शास्त्रोक्त ब्रह्मकर्म, दया, दान, धर्म, यांविषयी काहीतरी योग्य ते करावे. अन्य काही जमले नाही तरी निदान भगवंताचे भजन करावे. पूर्वी केलेल्या कुकर्मांचा पश्चात्ताप वाटून त्याग करावा. विविध शास्त्रग्रंथ वाचावेत. आपल्या कायाशुद्धीसाठी तीर्थयात्रा कराव्यात. किंवा पापक्षालनार्थ गायत्रीची पुरश्चरणे करावीत. जमेल तेवढा परोपकार करावा. गुरूच्या मुखातून ऐकलेल्या निरूपणाच्या साह्याने सारासार विचार करावा. कायावाचामनाने पान, फूल, फळ आणि पाणी ह्यातले जमेल ते देवाला अर्पण करून नरदेह सार्थकी लावावा.

**नरदेहाची प्राप्ती झाली, सार्थक त्याचे करा।**
**जीवनीं गुरुबोधाला स्मरा।**



## २ फेब्रुवारी

**पुण्यसामग्री पुरती। तयासीच घडे भगवद्भक्ती।**
**जे जे जैसें करिती। ते पावती तैसेंची।** (२-४-२७)

भगवंताची भक्ती करावी असे मनात येणे ही गोष्ट त्या मनुष्याने प्राप्त केलेल्या पुण्याईचे फळ असते. ज्या प्रमाणात पुण्याचा साठा असेल त्या प्रमाणात आपल्याकडून देवाची भक्ती होते. ही पुण्याची सामग्री ह्या जन्मातली आणि पूर्वी घेतलेल्या अनेक जन्मांतील जमा झालेली असते. मरताना जी मती, म्हणजेच बुद्धी असते त्यानुसार प्राणिमात्रांना पुनर्जन्म लाभतो. ज्या कुटुंबात आपणाला जन्म मिळतो त्या घरातील संस्कारांचा प्रभावही भक्तिभावास कारणीभूत होतो. अशी एकच गोष्ट आहे की कोणालाही कोणत्या मातापितरांच्या घरी पुनर्जन्म घ्यावा याचे स्वातंत्र्य नसते. पूर्वजन्मींच्या पापपुण्यानुसार जन्म मिळतो. जन्म कुठे घ्यावा हे हातात असते तर सगळ्यांनीच कोट्यधीशांच्या घरी जन्म घेतला असता. योगभ्रष्टांचा, पवित्र आणि श्रीमंतांच्या घरी पुनर्जन्म होतो. त्यामुळे त्यांचे मागच्या जन्मातले अपूर्ण पुण्यकर्म आणि भगवंताची भक्ती पुन: सुरू होते. तीच गोष्ट अन्य प्राणिमात्रांची. अर्थात् पुनर्जन्म आणि पूर्वजन्मावर विश्वास असला तरच हे पटणारे आहे. ज्ञानेश्वरी सांगतांना श्रीज्ञानेश्वरांचे वय फार लहान होते. या जन्मात पुण्यकर्म ते करीतच होते. परंतु मागील अनंत जन्मांतील पुण्याचे फळ त्यांच्या खात्यात जमा होते. प्रसूतिगृहात एकाच वेळी जन्माला येणाऱ्यांची ऐहिक स्थिती पूर्वपुण्याईवर अवलंबून असते. या जन्मात केलेली सत्कर्मे, तप, व्रते वैकल्ये यांच्यानुसार पुढील जन्म लाभतो.

**पूर्वपुण्याई असेल तरच देवाची भक्ती हातून होईल.**



## ३ फेब्रुवारी

**रजोगुण येतां शरीरीं। वर्तणूक कैसी करी।**
**सावध होउनी चतुरीं। परिसावें॥** (२-५-७)

सत्त्व, रज, तम, ह्या तीन गुणांनुसार मनुष्याची प्रवृत्ती अनुक्रमे सात्त्विक, राजस आणि तामस होते. मनुष्याच्या स्वभावात या त्रिगुणांचा त्रिवेणी संगम झालेला असतो. समर्थ रामदास प्रथम रजोगुणी माणसाचे वर्णन करतात. जगातील बहुसंख्य माणसे रजोगुणी आढळतात. प्रत्येकात अहंकार असतो, ममत्व असते. 'माझे घर, माझा संसार' असे सर्वजण आसक्तीमुळे म्हणतात. जीवनातील अत्यावश्यक गोष्टीत देवालाही स्थान देणारे विरळाच. देवाने हे सर्व विश्व निर्माण केले आहे. हे विसरून रजोगुणी मनुष्य पूजा करताना षोडशोपचार अर्पण करतो, परंतु त्यात मी हे देवाला देतो असा कर्तृत्वाचा पोकळ अभिमान असतो. सगळे सुखी होवोत असे मागणे मागितले तर त्यात आपणही आलोच हे लक्षात न घेता रजोगुणी मनुष्य आपल्या संसारापुरते मागणे मागतो. चांगलंचुंगलं खायला मिळावं, नेसायला पांघरायला उत्तम वस्त्रे मिळावी, दुसऱ्यापेक्षा आपण सर्वच बाबतीत वरचढ असावे, असा स्वार्थी विचार करणारा रजोगुणी मनुष्य, पापपुण्य, देवधर्म, कुलाचार, अतिथी, पाहुणे, वगैरेंचा पाहुणचार यांचा फारसा विचार न करता, परमार्थविषयक उपासना ही म्हातारपणी करावयाची असते असे मानतो. श्रीमद्भगवद्गीतेत रजोगुणी माणसांचे सविस्तर वर्णन आहे. त्याचा आधार रामदास स्वामींनी घेतला आहे. 'मी चतुर, माझे घर, माझा समाज, माझा देश', अशी मीची बाधा रजोगुणामुळे होते.

**माझें माझें। भ्रांतिचें सर्व ओझें॥**



## ४ फेब्रुवारी

**जें जें दृष्टी पडिलें। तें तें मनें मागितलें।**
**लभ्य नस्तां दुःख जालें। तो रजोगुण।।** (२-५-२३)

रजोगुणी माणसाची आणखी काही वैशिष्ट्ये समर्थ रामदास सांगतात. ह्या वर्णनात त्यांचे मानवी स्वभावाचे सखोल निरीक्षण दिसून येते. कोणाकडे काही चांगली वस्तू बघितली की रजोगुणी माणसाला आपल्याकडेही ती असावी असे वाटू लागते. शेजाऱ्यांनी मोटार घेतली, रंगीत टीव्ही घेतला, फ्रीझ, वॉशिंग मशीन, ए.सी. वगैरे घेतला की त्या सगळ्या गोष्टी आपल्या घरी आणण्याची चढाओढ रजोगुणामुळेच होते. दुसऱ्याची सुंदर बायको पाहिली की रजोगुणी माणसाला ती हवीशी वाटते. ह्या सर्व गोष्टी मिळाल्या नाहीत की रजोगुणी मनुष्य दुःखी होतो. हास्यविनोद, शृंगारपूर्ण नाच, गाणी, तमाशे, नाटके, रजोगुणी माणसाला अत्यंत प्रिय असतात. 'टवाळा आवडे विनोद' असे रामदासस्वामी म्हणतात. रजोगुणी माणूस लोभी असतो. तो जन्ममरणाच्या फेऱ्यात अडकतो. सांसारिक प्रपंचात वासना गुंततात. अशा त्या रजोगुणाच्या विकारावर औषध कोणते? 'उपाय येक भगवद्‌भक्ती!' जरी विरक्ती बाणली नाही तरी यथाशक्ती भगवंताचे भजन करावे. ईश्वराला यथाशक्ती पाने, फुले वगैरे अर्पून, सुखदुःखे भोगताना देवाचेच चिंतन करावे.

**आरंभी व शेवटी एक देवच खरा शाश्वत असतो.**
**आपली त्या भगवंतावर पूर्ण निष्ठा असावी.**



५ फेब्रुवारी

**आतां रजोगुण हा सुटेना। संसारिक हें तुटेना।**
**प्रपंचीं गुंतली वासना। यास उपाय कोण।** (२-५-३५)

रजोगुण सुटता सुटत नाही. संसाराची बंधनेही तुटत नाहीत. वासना प्रपंचात गुंतून राहते. ही वस्तुस्थिती आहे. यावर काही उपाय आहे का? ह्या प्रश्नाचे उत्तर देताना श्रीसमर्थ सांगतात की याला एकच उपाय आहे. तो म्हणजे भगवंताची भक्ती. ती साध्य करायची तर वैराग्य हवे. प्रपंचात मन आसक्त असता कामा नये. हे साधले नसेल तर आपापल्या शक्तीनुसार भगवंताचे भजन करावे. कायावाचामनाने, पान, फूल किंवा नुसते पाणी अगदी मनापासून ईश्वराला अर्पण करावे. संसारातील सुखदु:खांचा अनुभव घेतानाही फक्त भगवंताचे चिंतन करावे. ह्या दृश्य विश्वाच्या उत्पत्तीपूर्वी देव होता आणि ह्या दृश्य विश्वाचा लय म्हणजे संहार झाला तरी एकटा देव शिल्लक उरतो. ह्या उत्पत्ति आणि लय अवस्थांमध्ये मायेची सत्ता चालते. तिला खरी न मानता फक्त देवावरच पूर्ण विश्वास ठेवावा. ध्रुव, प्रल्हाद, वगैरे भक्तांच्या चरित्रावरून हाच बोध होतो. बल्लाळ नावाच्या एका भक्ताने गणपती म्हणून एका दगडाची स्थापना करून, रानातील पाने, फुले, फळे आणून त्याची पूजा केली. त्यांचा भाव एकनिष्ठ होता, म्हणून बल्लाळेश्वर त्याच्यावर प्रसन्न झाला. त्रिगुणांतील प्रत्येक गुणात शुद्ध गुण व शबल (म्हणजे मिश्र) गुण असा भेद असतो. शुद्ध रजोगुण परमार्थाकडे, तर शबल रजोगुण प्रपंचाकडे ओढतो.

**सुखात असो वा दुःखात माणसाने देवाचे चिंतन सदैव करावे.**



६ फेब्रुवारी

**ऐसें वर्ते तो तमोगुण। परी हा पतनासी कारण।**
**मोक्षप्राप्तीचें लक्षण। नव्हे येणें** (२-६-३९)

तमोगुणी मनुष्य असा वागतो. असा म्हणजे कसा? संसारात दुःख भोगताना तमोगुणामुळे परमावधीचा क्रोध निर्माण होतो. रागाच्या भरात दुसऱ्याचा प्राण घ्यावा किंवा आपला प्राण द्यावा असे वाटणे हा तमोगुणाचा प्रभाव. क्रोधाचे वारे अंगात शिरले की मनुष्य बेफाम होतो व एखाद्या पिशाच्चासारखा वागतो तमोगुणी माणसाला लढाई आवडते. प्रेमाचे मनुष्य मेले तर तो त्यासाठी जीव देतो, अथवा आत्महत्या करतो. किडे, मुंग्या आणि जनावरे मारणे हा त्याचा छंद असतो. तो अत्यंत निर्दय असतो. मनामध्ये दुष्टबुद्धी धरून असा मनुष्य दुसऱ्याचे सदैव कमालीचे नुकसान करतो. मंदिरे पाडावी, चांगली फळे देणारी झाडे तोडावी, भ्रष्टाचार करावा, दुसऱ्यांना विष खायला द्यावे, दुसऱ्याच्या दुःखात आनंद मानावा, वेद-शास्त्रे आणि देवधर्म यांचा द्वेष करावा, आचारधर्म सोडावा, वडील मंडळींचा उपदेश ऐकू नये, जारणमारण उच्चाटन आदी चेटकी विद्येचा अभ्यास करावा, अघोरी प्रयोग करावे, आळसात दिवस घालवावा, देवाची निंदा करावी, संतसंग न धरावा, हे सर्व तमोगुणाने होते. त्यामुळे जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून मुक्ती मिळत नाही. त्यासाठी सत्त्वगुणाची आवश्यकता आहे.

**सर्व दुःखाचे मूळ जो जन्म-मरणाचा फेरा,**
**तो रजोगुण अथवा तमोगुण यांनी सुटत नाही.**



## ७ फेब्रुवारी

**संसारदुःख विसरवी। भक्तिमार्ग विमळ दावी।**
**भजनक्रिया उपजवी। तो सत्त्व गुण।।** (२-७-१०)

सत्त्वगुण अत्यंत दुर्लभ आहे. तो संसारातील दुःखांचा विसर पाडतो, निर्मळ असा भक्तिमार्ग दाखवितो हातून भजनादी कार्ये घडवून आणतो. तो योगीजनांचा आधार आहे. त्याच्यामुळे सायुज्यमुक्ती मिळते. महंतांना भूषणभूत, रजतमांचा नाश करणारा सत्त्वगुण अत्यंत सुखदायी असून तो साधकाच्या चित्तात आनंदाच्या लहरी उठवितो. जन्ममृत्यूचे भय नाहीसे करतो. सत्त्वगुण अंगात बाणला की अज्ञान संपते. पुण्याचा उदय होतो. सत्त्वगुणाचे मुख्य साधन असे आहे की साधक चारचौघांप्रमाणे बाह्यतः प्रपंच करताना दिसला तरी त्याच्या मनात ईश्वराविषयी अतिशय प्रेम असते. प्रपंचातले कार्य जरुरीपुरते तो करतो; परंतु त्याच्या चित्तात आत्मा आणि अनात्मा यातील भेद सदैव जागृत असतो. सत्त्वगुणाचा उदय झाला की, भजनात गोडी वाढू लागते. अंतःकरण, वस्त्रे व शरीर स्वच्छ होते. सत्त्वगुणी साधक स्वतः यज्ञत्याग करतो आणि दुसऱ्यांकडून करवितो; अध्ययन, दानादी स्वतः करतो व इतरांनाही त्यांची गोडी लावतो; मंदिरे बांधणे, उद्याने तयार करणे, नदीला घाट बांधणे, देवमंदिरात नंदादीप सुरू करणे, विविध संगीतवाद्ये देवालयांना अर्पण करणे, वगैरे कार्ये करतो. परंतु हे करताना प्रसिद्धी व कीर्तीची इच्छा असेल तर सत्त्वगुण शुद्ध नसून रजोगुणयुक्त मानावा.

**देवाचे ध्यान करताना, हरिकथा गाताना,**
**देहाचे भान विसरावयास लावतो तो सत्त्वगुण.**



८ फेब्रुवारी

**मुखीं नाम हातीं टाळी। नाचत बोले ब्रीदावळी।**
**घेऊन लावी पायधुळी। तो सत्त्वगुण।।** (२-७-४१)

सत्त्वगुणाने युक्त साधक मुखाने नामघोष करीत असतो. हातांनी टाळ्या वाजवितो, नाचतो आणि भगवंताचे गुणगान करीत भगवद्भक्तांची पायधूळ मस्तकी लावतो.

सत्त्वगुणी साधक देवाच्या मंदिरात झाडलोट करण्यासारखी हलकी कामे स्वत: करतो आणि नित्य व नैमित्तिक उत्सव साजरे करण्याची त्याला मनापासून आवड असते. सत्त्वगुणी साधकाची, 'मी जगासाठी आहे', ही भावना असते, त्यामुळे तो नि:स्वार्थी असतो. सूक्ष्म अशा अदृश्य तत्त्वाला सर्वस्व मानून तो त्यागवृत्ती पोसतो. सत्त्वगुणी साधक चिंतनशील व निवृत्तिपर असतो. वासना निर्मूळ करण्याच्या प्रयत्नात सत्त्वगुणी भक्ताचे आत्मज्ञान प्रगट होते. त्याच्या मनात सदैव समाधान असते. साधु, संत, योगी, त्यागी, आत्मज्ञानी भक्तांप्रमाणे होण्याची इच्छा त्याच्या मनात निर्माण होते. असा सत्त्वगुणी मनुष्य दुसऱ्याच्या दोषांवर पांघरूण घालतो. दुसऱ्यांच्या दु:खाने दु:खी आणि सुखाने सुखी होतो. दु:खांचे आघात झाले तरी त्याचे मन विचलित होत नाही. हरिकथा, भजन, कीर्तने हीच त्याची विरंगुळ्याची साधने असतात. भगवंताचे अखंड स्मरण केल्यामुळे त्याचे देहभान हरपते. असे आहे सत्त्वगुणाचे पारमार्थिक स्वरूप.

**अज्ञानपर क्रूर तमोगुण आणि स्वार्थी रजोगुण यांच्याहून परमेश्वराचे सख्य घडविणारा सत्त्वगुण श्रेष्ठ आहे.**



## ९ फेब्रुवारी

**होणार तैसें होत जात। प्रपंचीं जाला आघात।**
**डळमळिना ज्याचें चित्त। तो सत्त्वगुण।।** (२-७-५७)

जे होणार ते होणारच. हे तत्त्व मनात बिंबल्यामुळे प्रपंचात मोठे संकट आले तरी ज्याचे चित्त डळमळत नाही, त्याच्या अंगी सत्त्वगुण बाणला आहे असे निश्चित मानावे. आपण सामान्य माणसे जरा काही मनाविरुद्ध झाले तर विचलित होतो. दुःखाच्या आघाताने खचून जातो. संत तुकाराम, श्रीज्ञानदेवादी संत मोठमोठी दुःखे अगदी सहज सहन करू शकले. याचे कारण त्यांच्या मनात सत्त्वगुण पूर्णपणे बाणलेला होता. एका भगवंतासाठी सत्त्वगुणी मनुष्य सर्व सुखांचा त्याग करतो. घरात अत्यंत दारिद्र्य असले तरी अशा सत्त्वगुणी व्यक्तीचा भक्तीचा निश्चय अविचल राहतो. शुद्ध आत्मज्ञान होणे हीच सत्त्वगुणाची खरी किमया आहे. सर्वांशी तो नम्रपणे बोलतो. दुसऱ्यावर उपकार करण्यात आपले आयुष्य खर्च करणे, स्वत:चे काम बाजूस सारून दुसऱ्याचे काम करणे, राग आवरणे, निंदकावरही उपकार करणे वगैरे क्रिया सत्त्वगुणाचा प्रादुर्भाव दाखवितात.

**रजोगुण आणि तमोगुणाची बंधने सत्त्वगुणाच्या वृद्धीनुसार कमी कमी होत जातात.**



१० फेब्रुवारी

**संतकृपा होय जयास। तेणे उद्धरिला वंश।**
**तो ईश्वराचा अंश। सत्त्वगुणें।।** (२-७-७८)

ज्याच्यावर संतांची कृपा होते त्याने आपल्या वंशाचा उद्धार झाला असे समजावे. असा मनुष्य त्याच्यात ईश्वराचा अंश, अधिक प्रामुख्याने प्रकट झाल्याने धन्य होतो. संतांची कृपा झाली की ती व्यक्ती अन्य लोकांनाही भगवंताच्या भक्तीची गोडी लावते. अशा मनुष्याला देवपूजा, देवाला प्रदक्षिणा, देवाला नमस्कार, वगैरे गोष्टी प्रिय असतात. असा मनुष्य मनाने शुद्ध असतो आणि सर्वत्र स्वच्छता ठेवतो. दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होणारा, दुसऱ्याच्या संतोषात सुखावणारा, वैराग्यवृत्तीत मग्न असणारा, असा असतो सत्त्वगुणी मनुष्य. संक्षेपाने सांगायचे तर सत्त्वगुणी माणसाला देवाची आणि धर्माची मनापासून आवड असते. त्याचे चित्त देवात आणि धर्मात रमते. निरिच्छपणाने तो भगवंताची भक्ति करतो. सत्त्वगुण संसारातून तारतो. भगवंताची भक्ती ज्याच्या मनात दृढ झाली, ज्याला आत्मज्ञान झाले, आणि ज्याचा आपपर भाव नष्ट झाला, असा मनुष्य सत्त्वगुणी आहे असे निश्चित समजावे.

**दुसऱ्यांच्या सुखदुःखांत सहभागी होण्याची**
**वृत्ती जोपासतो तो सत्त्वगुणी समजावा.**



## ११ फेब्रुवारी

**ऐका सद्विद्येचीं लक्षणें। परमशुद्ध सुलक्षणें।**
**विचार घेतां बळेंचि बाणे। सद्विद्या आंगीं।।** (२-८-१)

सद्विद्यायुक्त सत्त्वगुणी माणसे मानवी जीवनात जे जे अध्यात्माला पोषक असते त्याचे मनापासून आचरण करतात. रजोगुणी माणसे फार स्वार्थी आणि देहसुखासाठी झटणारी असतात. तमोगुणी किंवा कुविद्यायुक्त माणसे अविवेकाचा अतिरेक करतात. ती हीन स्वार्थयुक्त आणि समाजविध्वंसक कृत्ये करतात. या तिन्ही गुणांच्या माणसांना आत्मिक सुधारणेसाठी आदर्शाची आवश्यकता असते. सद्विद्यायुक्त आदर्श पुरुषाची शुभ व उत्तम लक्षणे, समर्थ रामदासांच्या मते, सतत विचाराने अंगी बाणतात, यात संशय नाही. सद्विद्या म्हटली की श्रीरामचंद्र आणि त्यांचे एकनिष्ठ भक्त मारुतिराय यांची आठवण व्हावी. अशा गुणांचे पुरुष ज्या समाजात उदयाला येतात त्यांचे भाग्य उदयाला येते. अशा थोरांचे चरित्र अनेक पिढ्यांना स्फूर्ती देते.

सद्गुणांच्या जर जोड्या केल्या तर त्यातील दोन्ही लक्षणे ज्याच्या अंगी असतात असा माणूस विरळाच. महानुभावांच्या अंगीच हे सर्व गुण असतात. असे महानुभाव सुंदर आणि चतुर असतात. बलवान आणि शांत, तसेच सौम्य, अति श्रीमंत असूनही उदार, महाज्ञानी असूनही उत्तम भक्त, मोठे पंडित आणि विरक्त, मोठे तपस्वी असून अत्यंत शांत असतात. वक्तृत्वयुक्त, निर्लोभी, ज्ञानसंपन्न आणि दुसऱ्याचा आदर करणारे श्रेष्ठ व लीन, राज्यपदावर असूनही धार्मिक वृत्तीचे, शूर आणि विवेकी असतात. ही सद्विद्येची काही लक्षणे आहेत.

**आदर्श व्यक्ती जितकी अंतरंगांत पवित्र तितकीच सदाचारी असते.**



## १२ फेब्रुवारी

**असो ऐसे उत्तम गुण। हें सद्विद्येचें लक्षण।**
**अभ्यासाया निरूपण। अल्पमात्र बोलिलें।।** (२-८-३०)

सद्विद्येची थोरवी वर्णन करावी तेवढी थोडीच. सद्विद्यायुक्त मनुष्य ज्ञानाच्या अनेक शाखांत पारंगत असतो आणि त्यासंबंधी आपले निश्चित मत देण्याइतका बहुश्रुत असतो. साधुवृत्ती, पवित्र, शुद्ध मन, पुण्यशील चारित्र्य, दयाळूपणा, कर्मनिष्ठा, स्वधर्मपालन, परमार्थप्रियता, सतत भगवंताचे अनुसंधान, श्रुती आणि स्मृतींचे ज्ञान असणे, चूक झाली तर पश्चात्ताप वाटणे, सर्व बाबतीत सावधपणा, लबाडांची लबाडी ओळखण्याइतकी धूर्तता, सत्याचरण, नियमित आणि चटपट काम करणे, दुसऱ्याचा आदरसन्मान करण्यात तारतम्य भाव, सावधानता, उद्योगशीलता, ही सद्विद्येची लक्षणे आहेत. सद्विद्यायुक्त मनुष्य बोलतो कसा, वागतो कसा, दिसतो कसा, आणि साधन कसे करतो याचे सूक्ष्म वर्णन श्रीसमर्थ रामदासांनी केले आहे. असा मनुष्य पैसा आणि बायका यांच्या बाबतीत अत्यंत पवित्र असतो. पुष्कळपणा, प्रशंसा, नित्यसंबंध, जवळ असणे, मध्ये असणे अशा अर्थाचे द्योतक 'मत्' आणि 'वत्' हे प्रत्यय लागून सामान्यत: जी उत्तम लक्षणे होतात ती सर्व सद्विद्येची द्योतक असतात. रूपवान, गुणवान, कीर्तिमान, लक्ष्मीवान, ही त्यातली काही विशेषणे. ही वर्णने करताना समर्थांची निर्मळ स्फूर्ती स्पष्टपणे व्यक्त होते. मराठी भाषेवरील समर्थांचे प्रभुत्व हे सद्विद्येचेच लक्षण.

**सुरेख दिसणे, सुंदर असणे, हे (ईश्वरदत्त) गुण वगळता,**
**अन्य सर्व सद्‌गुण अभ्यासाने साध्य करून घेता येतात.**



## १३ फेब्रुवारी

**ऐका विरक्तांची लक्षणें। विरक्तें असावें कवण्या गुणें।**
**जेणें अंगीं सामर्थ्य बाणे। योगियाचें॥** (२-९-१)

सामान्यत: 'माझा देह म्हणजे मी', असा भ्रम मनुष्याच्या मनात असतो. त्यामुळे तो दृश्य, स्थूल, इंद्रियप्रिय व अशाश्वत विश्वाच्या पसाऱ्यात अविद्येमुळे गुंततो. या देहाला जिवंतपणा ज्याने येतो तो आत्मा आहे अशी भावना सद्विद्येने निर्माण झाली, की अदृश्य, सूक्ष्म, अतींद्रिय व शाश्वत सच्चिदानंदाचा साक्षात्कार होतो. अविद्या म्हणजे प्रपंचविद्या तर सद्विद्या म्हणजे परमार्थ. या दोन्ही मार्गांत, मन दृश्याच्या कचाट्यातून जेव्हा बाहेर पडते त्या अवस्थेला वैराग्य म्हणतात. वैराग्यसंपन्न झाल्याशिवाय परमार्थ साधत नाही. उत्तम आणि सत्त्वगुण अंगी बाणले की वैराग्याचा उदय होतो. विरक्ताची लक्षणे आणि गुण संक्षेपाने असे आहेत - वैराग्यसंपन्न पुरुषाची कीर्ती सगळीकडे पसरते. त्याच्या जन्माचे सार्थक होते. अशा माणसाचा स्वानंद उचंबळून येतो आणि सारासार विवेकाने वैराग्य दुप्पट तेजस्वी होते.

श्रीसमर्थ रामदासांच्या मते, विरक्त मनुष्य स्वत: मोठा ब्रह्मज्ञानी, शांत व निष्पाप असतो. तो चतुर व लोकसंग्रहकर्ता असतो. मोठ्या धीराने तो आपले नेतेपण सांभाळतो. तो लोकांना अध्यात्म शिकवितो आणि त्यांच्या अंतरंगात खरा विवेक निर्माण करतो. समाजातील उच्च, नीच, उत्तम, हीन अशा सर्व माणसांना जवळ करून त्यांना सन्मार्गाकडे वळवून त्यांचे समाधान करतो.

**स्फुरे जीवनी कल्पना ते अविद्या। स्फुरे ब्रह्म हे जाण माया सुविद्या॥**



## १४ फेब्रुवारी

**विरक्तें धर्मस्थापना करावी। विरक्तें नीति अवलंबावी।**
**विरक्तें क्षमा सांभाळावी। अत्यादरेंसीं॥** (२-९-११)

विरक्ताची आणखी कर्तव्ये वर्णन करताना समर्थ रामदास सांगतात - विरक्ताने धर्मस्थापना करावी, भाविकांचा सांभाळ करावा, उपासना मार्ग वाढवावा व निंदकांनाही क्षमा करून लाजवावे. **स्नान संध्या जपध्यान। तीर्थयात्रा भगवद्‌भजन। नितनेम पवित्रपण। अंतर शुद्ध असावे ॥** विरक्ताने कर्म, उपासना, ज्ञान, सिद्धान्त, प्रवृत्ती व निवृत्तीचा मार्ग जाणावा. योग ध्यान, विदेह, उदास स्थिती, यंत्र-तंत्रादी नाना मते जाणून घ्यावीत, परंतु आपणावर त्यांचा परिणाम होऊ देऊ नये. विरक्ताने जगमित्र असावे. विरक्त मनुष्य एकांतप्रिय असून मोठा लोकसंग्रही असावा. निर्भयता, गांभीर्य, उदारता, प्रामाणिक आणि प्रासादिक प्रवचन-कौशल्य, नेहमी सावधानता, हे सगळे गुण विरक्तात असावे. त्याच्या ज्ञानाला लांबी-रुंदी व खोलीही असावी. विरक्ताने आपल्या निरूपणात शुद्ध परमार्थ सांगावा. त्याने उत्तम गुणांचा स्वीकार करावा. या विरक्त लक्षणांचा समारोप रामदासांनी असा केला आहे -

'मी वर्णन केलेल्यातील जेवढी पसंत पडतील तेवढी लक्षणे घ्यावीत. मी फार बोललो म्हणून श्रोत्यांनी खिन्न होऊ नये. उत्तम लक्षणे न स्वीकारता अन्य लक्षणांचा स्वीकार केला तर जीवनात काही ताळतंत्र राहत नाही. असे वागणाऱ्या माणसाच्या अंगात पढतमूर्खपणा येतो, विरक्ताने म्हणूनच या सर्व गुणांपैकी अधिकांत अधिक गुण अंगी बाणविण्याचा प्रयत्न करावा. संत तुकाराम, ज्ञानेश्वर, आणि स्वत: समर्थ रामदासांचे जीवन, आदर्श विरक्ताचे आहे.

**आपले प्रेम भगवंताकडे वळणे हा भक्तिमार्ग तर**
**दृश्य विश्वाचे खोटेपण पटणे हा ज्ञानमार्ग होय.**



## १५ फेब्रुवारी

**जन्म जीवाचे मीपण। जन्म अहंतेचा गुण।**
**जन्म हेंचि विस्मरण। ईश्वराचें।।** (३-१-८)

आपल्याला ह्या जगात जी विविध दुःखे भोगावी लागतात, त्याचे मूळ कारण काय? तर आपण जन्माला आलो. जन्मलोच नसतो तर कशाला हव्या होत्या पुढच्या उठाठेवी? मरणापर्यंतच्या? याच दृष्टीने समर्थ रामदास म्हणतात - **जन्म दुःखाचा अंकुर। जन्म शोकाचा सागर। जन्म भ्रमाचा डोंगर। चलेना ऐसा।।** गर्भवासात, प्रत्यक्ष प्रसूतीच्या वेळी आणि जन्म घेतल्यानंतर होणाऱ्या दुःखांचे वर्णन स्वामींनी फार प्रभावी रीतीने केले आहे. 'मनाच्या श्लोकांत'ही हे वर्णन आहे. जीव जेव्हा स्वस्वरूप विसरतो तेव्हा तो भगवंतापासून वेगळा होतो. अद्वैताचे द्वैत होते. तसे झाले की जीव अपूर्ण बनतो व त्यामुळे वासनेचा जन्म होतो. ही देहबुद्धीच भावी जन्ममरणांचे कारण होते. मानवी जन्म संकुचित स्वार्थामुळे अनेक प्रकारच्या शारीरिक आणि मानसिक दुःखांचे भांडार होतो. साधकाला हे गूढ तसेच सूक्ष्म कारण सांगून, त्यानंतर आईच्या गर्भाशयात देहाची वाढ होताना जीव जे दुःख भोगतो त्याचे जे वर्णन स्वामींनी केले आहे ते मनाला चटका लावून जाते. जन्माला आला की जीवाचा मीपणा चालूच होतो, अहंता वाढते आणि ईश्वराचे विस्मरण होते. 'बायको माझी, मुले माझी, घर माझे, संपत्ती माझी, असे 'माझे माझे' विचार मनात दृढ होतात.

**जन्म हा एक अपघात आहे, तर मृत्यू स्वाभाविक आहे.**



## १६ फेब्रुवारी

**गर्भी म्हणे सोऽहं सोऽहं। बाहेरी पडतां म्हणे कोऽहं।**
**ऐसा कष्टी जाला बहु। गर्भवासीं।।** (३-१-४७)

जन्मल्यानंतर मूल रडते. ते रडले नाही तर रडायला लावतात. नवजात मुलाच्या रडण्याचा आवाज म्हणजे जणू 'कोऽहं', 'मी कोण आहे' असा प्रश्न. गर्भात असताना जीव 'सोऽहं' म्हणजे, 'मी तो (परमात्मा) आहे.' असे म्हणतो, तर जन्म झाला की ते ऐक्य तो विसरतो. **निरोधें पचे कोंडिलें गर्भवासीं। अधोमूख रे दुःख त्या बाळकासी।।** सरळ जन्म झाला तर ठीक, नाहीतर गळा, खांदा, वगैरे अवयव कुठेतरी अडकतो. मग अरुंद मार्गातून बालकाला चिमटा लावून खेचून काढतात, किंवा आईचे पोट फाडून मूल बाहेर काढतात. कधी कधी जन्माला येताना मूल मरतेच, परंतू आईचाही मृत्यू होतो. आईचा मृत्यू झाला आणि मूल जगले तर आईवाचून पोरके जीवन त्याला जगावे लागते. सद्गुरु मिळाला तर त्याच्या बोधाप्रमाणे वागल्यास जीवाला स्व-रूपाची जाणीव होते व तो 'सोऽहं' म्हणजे, 'मी तोच आहे' ह्याचा अनुभव घेतो. गर्भात सोऽहं असा अजपा जप चालू असतो. मोठ्या कष्टाने जन्म झालाच, तर बाहेर आल्यावर गर्भवासातल्या यातना मूल विसरून जाते. पूर्वीचे काही स्मरत नाही. अज्ञानाचे आवरण चढते. शरीर मायेच्या जाळ्यात सर्व बाजूंनी अडकते, पुन्हा पुन्हा गर्भवासाचे दुःख टाळण्याचा एकच उपाय आहे, तो म्हणजे परमेश्वराला शरण जाणे.

भगवंताचा भक्त जन्ममरणापासून मुक्त होतो. आत्मज्ञानाच्या जोरावर सर्वकाळ विरक्त राहातो.

**मानवी जीवन म्हणजे कोऽहं पासून सोऽहं पर्यंतचा प्रवास.**



## १७ फेब्रुवारी

**क्षणभरी मातेस न देखे। तरी आक्रंदे रुदन करी दुःखें।**
**ते समई मातेसारिखें। आणीक कोणीच नाहीं।।** (३-२-१०)

संसारात सुख मिळविण्यासाठी प्रापंचिक मनुष्य जी धडपड करतो तिची दिशा बहुधा सर्वत्र एकच असते. कुटुंबात नवरा, बायको, मुलगे, मुली ह्यांची लग्नकार्ये, पैसा, आजार, लौकिकाची चिंता, रोग, म्हातारपण आणि मृत्यू यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या समस्या सर्वसाधारणपणे सर्व काळात मूलतः सारख्याच असतात. जन्मानंतर थोडा मोठा होईपर्यंत मुलाला आई म्हणजे सर्वस्व वाटते. तिचा क्षणभर विरह झाला, ती दिसली नाही की बाळ भोकाड पसरून रडते. बाळाला त्यावेळी आईसारखे कोणीच वाटत नाही. लहान अर्भकाला बोलता येत नाही, त्यामुळे रोग एक आणि उपाय भलताच होतो. मग आई बाळाला जवळ घेते. कशीबशी समजूत घालते. मोठ्या आशेने बाळ आईची वाट पाहते. एकदा का तिची आठवण झाली की क्षणभरही तिचा वियोग सहन होत नाही. ब्रह्मदेवादी देव जरी आले किंवा प्रत्यक्ष लक्ष्मीने प्रेमाने बोलाविले तरी. 'तिथे माझी असणार नाही आई,' 'आई कोठे आहे', असा आक्रोश चालू राहतो. आई कुरूप असो, हीनलक्षणी असो, किंवा दुर्दैवी असो, बाळाला तिच्यासारखे दुसरे कोणीही वाटत नाही. आईवाचून मूल केविलवाणे होते. आईवरच बाळाचे सर्वस्व केंद्रित असते. आई म्हणजे जणू ब्रह्मांड, असे त्यावेळी बाळाला वाटते.

**स्वामी तिन्ही जगांचा। आईविना भिकारी।**



## १८ फेब्रुवारी

**लेकुरांमध्ये खेळतां। नाठवे माता आणि पिता।**
**तंव तेथेंही अवचिता। दुःख पावला।।** (३-२-२४)

लहानपणीच आई वारली तर मूल पोरके होते. ते आईला शोधते. एखादी बाई आईसारखी दिसली तरी ती आपली आई नाही हे बाळाला कळते. त्याला आईच्या वियोगाने कष्ट होतात. परंतु, सुदैवाने आई जगली, आणि मूल जरा मोठे झाले की त्याचे सगळे लक्ष खेळण्याकडे लागते. आईवरची एकनिष्ठ माया कमी होते. खेळण्याचा नाद किंवा छंद लागतो. खेळात डाव जिंकला तर आनंद आणि हरला तर दुःख होऊन लहान मुलगा रडू लागतो. कधीकधी सवंगड्यांबरोबर मारामारी होते व त्रास होतो. 'अभ्यास कर, खेळ कमी कर' असा उपदेश आईवडील करीत असतात पण ते त्याला आवडत नाही. सकाळी उठला की चालला खेळ खेळायला. गोट्या, विटीदांडू, (आजकाल क्रिकेट) अशा खेळांची चटक काही केल्या सुटत नाही. खेळताना कधी दात पडतात, डोळा फुटतो, पाय मोडतो आणि शरीराला व्यंग आल्याने कुरूपता येते.

बाळपणी ताप, देवी, गोवर असले आजार होतात. कधी डोके दुखते तर कधी ताप येतो, वा पोटात दुखते. मग निरानिराळे मंत्रतंत्रादी उपचार चालू होतात. अशा रीतीने त्रिविध तापांनी मूल पोळते. संसाराच्या दुःखांनी फार यातना सोसाव्या लागतात. नंतर अभ्यासासाठी घरी आईवडील मारतात तर शाळेत शिक्षक शिक्षा देतात. अशी अनेक दुःखे भोगावी लागतात.

**बालपणी खेळांची गोडी लागली की मुलगा आईलाही विसरतो.**



## १९ फेब्रुवारी

**येकें स्त्रियेचेनि गुणें। ब्रह्माण्ड मानिलें ठेंगणें।**
**जिवलगें तीं पिसुणें। ऐसीं वाटलीं।।** (३-२-५७)

बालपणातील दु:खांतून सुखरूप वाचला, चांगला शिकून मोठा झाला, नोकरी किंवा कामधंदा करू लागला की आईबाप चांगली मुलगी पाहून मुलाचे लग्न लावून देतात किंवा तो प्रेमविवाह करतो.

लग्न झाल्यावर मुलाची वृत्ती कशी पालटते याचे रेखीव व समर्पक वर्णन समर्थांनी केले आहे. बऱ्याच माणसांचा आईवडिलांपेक्षा सासुरवाडीच्या माणसांकडे कसा अधिक ओढा असतो, विवाहानंतर कामवासनेच्या आहारी गेलेल्या तरुणाला बायको सारखी हवीहवीशी वाटते. बायको घरात नसली तर अन्य नातेवाईक असूनही त्याला घर खिन्न वाटते. बायकोचा गोड मंजुळ शब्द, लाजरेपणा, कमळासारखा मोहक चेहरा यांनी पती भुलतो. नुसते तिला पाहताच संभोगाच्या विचारांनी त्याचे मन भरून जाते. व्यवसायात मन रमत नाही. उद्योगधंदा करतानाही मन बायकोकडे गुंतलेले असते. आपल्या बायकोला कोणी रागावले तर तो बायकोची बाजू घेऊन आईबापांना शिवीगाळही करतो. शेवटी बायकोच्या 'मी नी माझा नारा, नको दुसऱ्याचा वारा' या विचाराला बळी पडतो व वेगळे बिऱ्हाड करतो. स्त्रीकरतां तो लाज सोडतो, मित्र तोडतो, लंपट होतो आणि स्त्रीच्या नादी लागून त्याला सगळे ब्रह्मांड तिच्या पुढे कमी योग्यतेचे वाटते. प्रेमाचे नातेवाईक शत्रूप्रमाणे वाटतात. तो स्त्रीच्या संपूर्णपणे स्वाधीन होतो.

**लग्न झाल्यावर स्त्रीचा ध्यास लागून अन्य नातलगच काय, आईबापही नकोसे होतात.**



## २० फेब्रुवारी

**परस्त्री देखतांचि दृष्टीं। अभिलाष उठे पोटीं।**
**अकर्तव्यें हिंपुटीं। पुन्हां होये।।** (३-३-१६)

पहिली बायको दुर्दैवाने लवकर वारली तर तो दुसरे लग्न करतो. पहिल्या स्त्रीचा वियोग त्वरित विसरतो. भार्यादुःखं पुनर्भार्याम्। असे एक वचन आहे. ते सत्यच आहे. तो मागचे दुःख विसरून संसारात पुन्हा सुख मानू लागतो. कंजूषपणा करून पैसे वाचवितो. खूप पैसे साठले की अंतरंगातली पहिली विशुद्ध वासना टिकत नाही. असा मनुष्य देवाधर्माची, सज्जनांची निंदा करू लागतो. मुंगीच्या तोंडातला धान्याचा कणही वेचू लागण्याएवढा कवडीचुंबक होतो. स्नानसंध्या कशाला करायची? असे म्हणू लागतो. तरुण वय आणि जवळ पुष्कळ पैसा असल्यामुळे कामवासनेने बेफाम होऊन बाहेरख्याली होतो. घरवालीशिवाय बाहेरवाली जीवनात डोकावते. दुसरी बायको लहान असली तर भलत्याच स्त्रियांच्या नादी लागतो. परस्त्री दिसली की ती आपल्याला हवी अशी वासना निर्माण होऊन, ती प्राप्त होण्याची शक्यता नसेल तर दुःखी होतो, हिरमुसला होतो. मिळेल त्या स्त्रीचा उपभोग घेतो. पुढे वाईट रोग होऊन दीनवाणी अवस्था होते. सर्वांगात किडे पडतात. अशक्त होतो. त्यातच घरावर दरोडा पडून गाठीचा सगळा पैसा जातो. रोगाने सारे शरीर फुटते. अंगावर फोड उठतात. नाक सडते, आणि देह विद्रूप होऊन मनुष्य खंगून जातो. लहानमोठी माणसे त्याच्यावर शिसारीने थुंकतात. तो देवाजवळ मरण मागू लागतो.

**उपनिषदे वाचली, गीता पाठ केली तरी अरेरे,**
**ती चंद्रानना माझ्या मानस-सदनातून बाहेर जात नाही.**



## २१ फेब्रुवारी

**जालें आरत्र ना परत्र। प्रारब्ध ठाकलें विचित्र।**
**आपला आपण मळमूत्र। सेविला दुःखें।।** (३-३-२७)

विषयवासनेच्या तृप्तीच्या अतिरेकाने मनुष्य रोगग्रस्त होतो. अतिशय यातना होतात. घरात सगळी वाताहत होते. उरला सुरला पैसा चोर लुटून नेतात. स्वतःच्या मलमूत्राचे स्वतःच सेवन करण्याची वेळ येते. धड इहलोक नाही, धड परलोक नाही अशी अवस्था होते. प्रारब्धाचा असा विचित्र भोग भोगावा लागतो. तेवढ्यात एखाद्याच्या पापांचा भोग संपतो. दिवसेंदिवस रोग बरा होतो. प्राणी मरता मरता वाचतो. कोणी औषध आणून देतो ते लागू पडते. असाध्य रोगांतूनही तो बरा होतो आणि एकप्रकारे पुनर्जन्मच होतो. मग लग्नाच्या वेळी लहान वय असलेली दुसरी बायको, जी माहेरी गेलेली असते ती परत येते. ती आता वयात आलेली असते. पुन्हा पैसा जमतो आणि संसार सुरू होतो. लोक म्हणतात - 'हा माणसात आला. घरात दिवा लागू लागतो. संपत्ती मिळते. चीजवस्तू परत जमतात. परंतू एकच न्यून राहाते ते म्हणजे अपत्यहीनतेचे.

**जे प्रारब्धात असेल ते अटळ असते, ते भोगावेच लागते.**



## २२ फेब्रुवारी

**पुत्रसंतान नसता दुःखी। वांज नाव पडिलें लौकिकीं।**
**तें न फिटे म्हणोनी लोकीं। तरी हो आतां।।** (३-३-३२)

मनुष्य प्राण्याच्या जीवनाची कथा वर्णन करताना समर्थ म्हणतात, काही पुण्याईने रोगग्रस्त मनुष्य बरा होतो. दुसरी बायको वयात येते. संसार पुन्हा सुरू होतो पण मूलबाळ होत नाही. त्यामुळे घर बुडाल्यासारखे वाटते. अशा मनुष्याच्या पत्नीला लोक वांझ म्हणू लागतात. मग खूप खटपट चालू होते. पुष्कळ देवांना नवस करतात. तीर्थे, व्रते, उपासतापास, धरणे, पारणे यांचा सपाटा चालू होतो. संभोगसुख बाजूलाच राहते. वांझपणाने पती व पत्नी दोघेही कष्टी होतात. वांझपणाचा अपवाद जावा म्हणून निदान मुलगी तरी व्हावी असे मनात येते. तेवढ्यात कुलदेवता प्रसन्न होते आणि शेवटी एकादाचे मूल होते. त्याला पती-पत्नी फार जपतात. नजरेआड होऊ देत नाहीत. त्याला जरा काही झाले की रडू लागतात. मग पती-पत्नी अनेक देवतांची पूजा करतात. परंतु पूर्वीच्या काही पापांमुळे ते मूल अचानक मरते. घरात जणू अंधार पसरतो. पैसा असून काय उपयोग? वांझपणाचा दोष जातो. परंतु मूलबाळ घरात नसल्यामुळे जीवन उदास होते. मग देवाला आळवितात, "देवा, आम्हांला पैसा काय करायचा आहे? पैसा सगळा जाऊ दे, पण परत मूलबाळ होऊ दे."

**अपत्यहीनतेचे दुःख असह्य असते.**



## २३ फेब्रुवारी

**सोडून सकळ वैभव। त्यांचा वारयावेधला जीव।**
**तंव तो पावला खंडेराव। आणी कुळस्वामिणी।।** (३-३-४७)

दुर्दैवी दांपत्याला एक मूल होऊन मरते तेव्हा वांझपणा गेला तरी तिची पोरे वाचत नाहीत असे मरतवांझ नाव पडते. ते काही केल्या जात नाही. त्या दुःखाने पुनः दोघेजण रडू लागतात.

श्रीसमर्थांच्या काळी समजूतदार लोक मूलबाळ होण्यासाठी काय काय प्रकार करीत त्याचे वर्णन दासबोधात आहे. अपत्यहीन पती-पत्नी शोक करतात. 'आमचा वंशवेल तुटला! हाय रे देवा! आमचे निर्वाहसाधन बुडाले, आमची कुलस्वामिनी आमच्यावर का रागावली?'

पुत्रमुख पाहण्यासाठी पती व पत्नी मोठ्या खुषीने जळत्या निखाऱ्यांवरून चालत जायला तयार होतात. कुलस्वामिनीचा गळ टोचून घेतात. मूल झाले तर देवीला अर्पण करण्याचा आणि त्याला देवीचा भुत्या करण्याचे वचन देतात. मुलाचे नाव केरपुंजा ठेवीन असे म्हणतात. मुलगा झाला तर त्याच्या नाकात वेसण घालीन असा नवस बोलतात. अनेक गोसावी, बैरागी, शोधून त्यांचे उपाय करतात. सबंध विंचू घटाघट गिळतात. समंधाला प्रसन्न करण्यासाठी प्रयत्न करतात. अंगात देवता संचार करून घेतात. ब्राह्मणांना केळी, नारळ, आंबे यांची दाने देतात. अनेक प्रकारचे चेटकाचे प्रयोग अगदी हीन मंत्रप्रयोगही करतात. झाडाखाली अस्पर्श असताना न्हातात. फळती झाडे जाळतात. वैभव सोडतात. डोक्यात वारे शिरल्याप्रमाणे भ्रमिष्टासारखे वागतात. शेवटी खंडोबा आणि कुलस्वामिनी प्रसन्न होऊन मुलगा होतो.

**अपत्याविना घर सुने.**



## २४ फेब्रुवारी

**लेकुरें उदंड जालीं। तों लक्ष्मी निघोन गेली।**
**बापडीं भिकेसी लागलीं। खावया अन्न मिळेना।।** (३-४-१)

समर्थ रामदासांनी उदाहरणादाखल ही एक गोष्ट घेतली आहे. प्रथम मूल नसणे, ते झाल्यावर मरणे, त्यानंतर वाटेल ते भलेबुरे उपाय आणि त्यानंतर एकदाचे मूल होणे अशी कल्पना केली आहे. आज जमाना बदलला. अनेक शास्त्रीय शोध लागले. कृत्रिम गर्भधारणाही शक्य झाली. तरी अपत्यहीन दांपत्ये अघोरी कृत्यांचा आश्रय आजही घेताना दिसतात. नारायण नागबळीसारखे प्रयोग केले जातात. नवरा बायको दोघेही डॉक्टर असून मूलबाळ नसल्याची उदाहरणे आहेत. काहीजण आजकाल अनाथाश्रमातून किंवा एखाद्या नातेवाइकाचे मूल दत्तक घेतात. हाच योग्य मार्ग वाटतो.

समर्थांनी कल्पिलेल्या दांपत्याला एका मुलानंतर अनेक मुले होतात. मुलाबाळांनी घर भरून जाते. साठविलेला पैसा संपतो. खायला धड मिळत नाही. मुलांना भीक मागायची पाळी येते. काही कडेवर बसणारी तान्ही काही रांगणारी, अशी दहादहा मुले घरात असतात. त्यातल्या मुली वाढल्या तरी त्यांची लग्ने करून द्यायला जवळ पैसा उरत नाही. घर प्रपंच वाढतो. खाणारी तोंडे वाढतात. मुलगे मोठे होतात. मुले लग्नावाचून राहिली तर पुन्हा लोक नावे ठेवितात, ह्या जन्मदरिद्र्याने इतक्या मुलांना जन्म का दिला?'' घरातली चीजवस्तू गहाण पडते. कर्ज काढून मोठेपणा मिरविला जातो.

**सगळी सोंगे आणता येतात परंतु पैशाचे सोंग आणता येत नाही.**



## २५ फेब्रुवारी

**ऐसें रुण उदंड जालें। रिणाइतीं वेढून घेतलें।**
**मग प्रयाण आरंभिलें। विदेशाप्रती।।** (३-४-१५)

उदंड लेकरे होऊन, ऋण काढून सण करणाऱ्या दांपत्याचे वर्णन करताना समर्थ म्हणतात - कर्जे काढता काढता त्या कर्जाचा भार होतो. मग पती पैसे मिळविण्यासाठी परदेशी जातो. दोन वर्षे परदेशात राहतो. हीन लोकांची नोकरी करतो. अतिशय शारीरिक कष्ट भोगतो. नंतर काही पैसा गाठीला मारून मालकाच्या परवानगीने घराकडे परत येतो. घरातली बायका-मुले दारिद्र्यात अतिशय यातना भोगीत असतात. ती बापाला शिव्याशाप देतात. प्रपंचात सगळी माणसे आपले तेवढे सुख पाहतात. दुसऱ्याची जाणीव ठेवीत नाहीत. एकदा शक्ती क्षीण झाली की शेवटी कोणीच उपयोगी पडत नाहीत. परदेशाहून परतलेला बाप पैशांचे गाठोडे बायकोच्या हाती देतो. सगळ्यांना काहीबाही भेटी मिळतात. परंतू तो आनंद चारच दिवस टिकतो. घरातली माणसे बापाला परत परदेशात जाऊन पैसा मिळवायला सांगतात. पुन्हा बाप परदेशात जातो. बायकोमुलांचा वियोग त्याला नाइलाजाने सहन करावा लागतो. अनेकदा परदेशी ये-जा होते. घोड्यावर स्वार होऊन बाप वियोगाचे असह्य दुःख अनुभवीत पुन्हा परदेशात जातो.

**जोवरि पैसा तोवरि बैसा। सगे सोयरे जमति भुतें।**
**म्हातारा तूं जर्जर होतां। ढुंकुनि कोणी पुसति न तूतें।।**



## २६ फेब्रुवारी

**ते समईं माता आठवली। म्हणे धन्य धन्य ते माउली।**
**मजकारणें बहुत कष्टली। परी मी नेणेंचि मूर्ख।।** (३-४-३५)

पुनः परदेशात जाताना त्या माणसाला आपल्या आईची आठवण होते. कामवासनेच्या बळाने आपण चांगले वागलो नाही, हे त्याला पटते. प्रपंचात सगळा स्वार्थाचा बाजार आहे हे लक्षात येते. मीपणाने प्रपंचात त्याला दुःख झालेले असते. अशावेळी तो आईविषयी म्हणतो - 'धन्य ती माउली. तिने माझ्यासाठी फार कष्ट काढले. पण मला त्याची जाणीव झाली नाही. आज जर ती असती तर तिने मला कधीच परदेशी दूर जाऊ दिले नसते.' वियोग झाला असता इतर नातेवाईक रडतात खरे पण आई रडताना तिच्या पोटातील आग, अंतःकरणातील कळकळ, काही वेगळीच असते. मुलगा अगदी निकामी झाला तरी आई त्याला जवळ करते. त्याची दगदग पाहून ती मनात कळवळते. प्रपंचात अन्य सर्व गोष्टी मिळतील परंतु जन्मदायी आई पुन्हा मिळणार नाही. आई डाकीण असली तरी तिची आपल्या मुलावर अत्यंत माया असते. हजार बायकांच्या प्रेमाला आईच्या प्रेमाची सर येणार नाही. आईबापाशी भक्तीभावनेने वागतात ते धन्य होत. स्वार्थी मित्रांचा आपलपोटेपणा, बायकामुलांचे बेगडी प्रेम, लक्षात येऊन परदेशी जाताना रडू येते. पण ते अरण्यरुदन ठरते. शेवटी दुःखाने थकलेला भागलेला तो परदेशात जातो.

**आई थोर तुझे उपकार.**



## २७ फेब्रुवारी

**पुढें गेला विदेशासी। प्राणी लागला व्यासंगासी।**
**आपल्या जीवेसीं सोसी। नाना श्रम।।** (३-५-१)

एका माणसाची एक काल्पनिक कथा वर्णन करताना समर्थांनी परदेशात गेलेल्या माणसाचे पुढे काय होते याचे वर्णन केले आहे. या माणसाच्या आयुष्यातील सर्वच घटना प्रत्येक माणसाच्या आयुष्यात घडतात असे नाही. परंतु त्यातील काहीनाकाही भाग प्रत्येकाला लागू पडतो.

परदेशात अनेक प्रकारचे कष्ट तो माणूस अगदी मनापासून सोसतो. दोन-चार वर्षे कष्ट करून तो द्रव्य जमवितो आणि तसाच स्वदेशात परत येतो, तर देशात दुष्काळ पडलेला ! तो घरात जाऊन पाहतो तो मुलांची दैना झालेली दिसते. ते दृश्य पाहून तो दीनवाणा होऊन मोठ्याने रडू लागतो. त्याने आणलेले पदार्थ घाईघाईने खाताना काही मुले मरतात तर फार खाल्ल्याने अजीर्ण होऊन दुसरी मरतात. बायकोही मरते. एक-दोन मुले जगतात. काही दिवसांनी परिस्थिती सुधारते आणि तो तिसरे लग्न करतो. म्हातारा नवरा आणि तरुण बायको. शिवाय मुले मोठी झालेली. त्यामुळे मुले त्याला मारतात. त्याचे सगळे घरच दुष्काळाने बसते. पैसे संपतात. तो पुन्हा परदेशात जातो व पैसे जमवून स्वदेशी येतो. आता तिसरी बायको वयात आलेली असते. बायकोवर प्रेम जडते, परंतु मुलांशी भांडण होते.

**स्वदेशाची महती विदेशात राहिल्यावर समजते.**



## २८ फेब्रुवारी

**बापलेकां भांडण जालें। लेकीं बापास मारिलें।**
**तंव ते मातेनें घेतलें। शंखतीर्थ॥** (३-५-१९)

तिसऱ्या बायकोबरोबर संसार आनंदाने करू पाहतो तर मुले भांडू लागतात. कोणी कोणाचे ऐकत नाही. अखेर पंच बोलावून वाटे करतात. परंतु तो निकाल मुलांना पसंत पडत नाही. शेवटी पुन्हा भांडणाला तोंड लागते. बापलेकांचे भांडण होते. त्यात मुले बापाला मारतात. तेव्हा त्या मनुष्याची बायको ओरडू लागते, बोंबा मारू लागते. पुष्कळ लोक गोळा होतात. उभे राहून मजा पाहतात. ज्या मुलांसाठी नवससायास केले होते तीच आता त्याला मारतात. पुढे, जमलेले लोक भांडण मिटवितात. पुन्हा सारख्या वाटण्या होऊन बापलेकांचे भांडण एकदाचे मिटवितात. बाप तरुण पत्नीला घेऊन वेगळा राहू लागतो. तेवढ्यात परचक्र येते. शत्रू त्याच्या पत्नीला धरून नेतात. ती पुढे भ्रष्ट होते. त्या माणसाला अखेर एका खोपटात रहावे लागते. आपल्या बायकोची त्याला आठवण येते. स्वतः हाताने जेवण करावे लागते. मुले वेगळी झालेली, बायको शत्रूंनी धरून नेलेली. अशावेळी, वृद्धपणी त्याला देव आठवू लागतो. देवावाचून आपले कोणी नाही हे त्याच्या लक्षात येते. पैसा गेला, बायको गेली, घर गेले, शक्ती क्षीण झाली. पूर्वी देवाची कधी पूजा केली नव्हती. परंतु आता त्याच्यावर पश्चात्तापाची वेळ आली.

**'कोणी कोणाचा नसे' हे कळते, तेव्हा देव आठवतो.**



## २९ फेब्रुवारी

**जन्मवरी स्वार्थ केला। तितुकाही व्यर्थ गेला।**
**कैसा विषम काळ आला। अंतकाळीं।।** (३-५-५०)

म्हातारपणी होणारी देहाची दीनवाणी अवस्था अतिशय वास्तववादीपणे समर्थ वर्णन करतात. म्हातारपणी देह क्षीण होतो. सर्व शरीर वाळून जाते. वात, पित्त, कफाचा त्रास होतो. जिभेची बोबडी वळते. नाकांतून शेंबूड वाहू लागतो. तोंडाला घाण येते. मान लटलट कापते. डोळ्यांतून पाणी वाहू लागते. दात पडल्यामुळे तोंडाचे बोळके होते. (आजकाल दातांची कवळी बसवितात हे खरे पण रात्री ती काढून ठेवली की तोंडाचे बोळके दिसू लागतेच.) डोळ्यांनी दिसत नाही. (डोळ्यांत काचबिंदू झाला तर सांप्रतही ऑपरेशन होत नाही.) कानांनी ऐकू येत नाही. म्हातारपणी श्रवणयंत्राचा त्रास होतो. उपयोग होत नाही.अन्न पचत नाही. अन्न नीट चावले जात नाही. पित्तामुळे अन्न ओकून पडते. बसल्याजागीच मलमूत्र विसर्जन होते. केस पिकतात किंवा गळून पडतात. अंगावरचे मांस व कातडी लोंबू लागते. देह पराधीन होतो. स्नेही सोबती लांबूनच चौकशी करतात. ज्यांना जन्मापासून पोसले ते त्या वृद्धाच्या मरणाची वाट पाहतात. जन्मभर सुखासाठी धडपड करून अखेर दुःखच पदरात पडते. असे जीवन आहे. जन्मभर केलेला स्वार्थ व्यर्थ जातो. संसार फार कठीण आहे. म्हणून भगवंताला शरण जावे.

**शेवटची घडी गोड व्हावी, यासाठी बालपणापासूनच देवाला शरण जावे.**